**जिल्ह्यातील प्रलंबित असलेल्या महत्वाच्या प्रकल्प / योजनांचा आढावा- मा. मुख्यमंत्री महोदयांच्या स्तरावर आढावा घेण्यासाठी जिल्हा / महसूली विभागनिहाय सचिवांच्या समित्या गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१८/ प्र.क्र.३४/का-१४११,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०१ ऑक्टोबर, २०१८.

प्रस्तावना :

जिल्ह्यातील प्रलंबित असलेल्या महत्वाच्या प्रकल्प/योजनांचा मा.मुख्यमंत्री महोदय दि. ४ ऑक्टोबर, २०१८ नंतर जिल्हा स्तरावर आढावा घेणार आहेत. जिल्ह्यातील प्रलंबित असलेल्या प्रकल्प / योजना यांची सद्य:स्थितीत असलेल्या वस्तुस्थितीची माहिती संकलित करुन पुढील ६ महिन्यांच्या कालावधीत सदर प्रकल्प / योजना पूर्ण करण्याचे ठरविण्यात आले आहे. त्यासाठी जिल्हा / महसूली विभागनिहाय सचिवांच्या समित्या गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मा.मुख्यमंत्री महोदय जिल्ह्यातील प्रलंबित असलेल्या प्रकल्प / योजना यांचा आढावा घेणार असल्याने उपरोक्त पार्श्वभूमीवर जिल्हा / महसूली विभागनिहाय सचिवांच्या समित्या गठीत करण्यात येत असून त्याचा तपशील **परिशिष्ट-१** मध्ये दर्शविण्यात आलेला आहे.

२. मा. मुख्यमंत्री महोदय जिल्ह्यातील प्रलंबित असलेल्या प्रकल्प / योजना यांचा आढावा घेणार असून सदर प्रकल्प / योजनांचा तपशील **परिशिष्ट-२ व ३** मध्ये दर्शविण्यात आलेला आहे.

३. मा.मुख्यमंत्री महोदयांकडून घेण्यात येणा-या जिल्हास्तरीय आढावा बैठकांसाठी निमंत्रित सचिव व क्षेत्रिय स्तरावरील अधिकारी यांची यादी **परिशिष्ट-४** मध्ये दर्शविण्यात आलेली आहे.

४. मा. मुख्यमंत्री महोदयांकडून दि. ४ ऑक्टोबर, २०१८ नंतर घेण्यात येणाऱ्या जिल्हास्तरीय आढावा बैठक होण्यापूर्वी सचिव समितीने, वाटप करण्यात आलेल्या महसूली विभागाचे विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या बैठका अथवा व्ही.सी. (Video Conference) आयोजित करुन **परिशिष्ट-२** मधील प्रकल्प / योजनांसंदर्भात अद्यावत माहिती घेऊन आवश्यक शासन निर्णय / शासन परिपत्रक / आदेश / मार्गदर्शक सूचना / निर्देश इ. निर्गमित करण्याची कार्यवाही संबंधित प्रशासकीय विभागाकडून केली जाईल, हे सुनिश्चित करावे.

**५.** मा.मुख्यमंत्री महोदयांकडून दि. ४ ऑक्टोबर, २०१८ नंतर वेळोवेळी आढावा होण्यापूर्वी जिल्हा / महसूली विभागनिहाय **परिशिष्ट २ व ३** मधील केलेल्या प्रकल्प / योजनांसंदर्भात केलेल्या कार्यवाहीबाबतची आकडेवारीनिहाय माहिती सचिव समितीने नियमितपणे बैठका अथवा व्ही.सी. (Video Conference) घेऊन संकलित करावी. सचिव समितीस **परिशिष्ट २ व ३** मधील आवश्यक असलेली जिल्हा / महसूल विभागनिहाय सर्व प्रकल्प / योजनांची माहिती व अहवाल उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित विभागीय आयुक्त यांची राहील.

**६.** मा.मुख्यमंत्री महोदयांच्या दि. ४ ऑक्टोबर, २०१८ नंतर आयोजित होणाऱ्या आढावा बैठकीच्या सूचना व इतिवृत्त निर्गमित करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा / महसूली विभागनिहाय गठीत करण्यात आलेल्या सचिव समितीची राहील. जिल्हा / महसूली विभागनिहाय घेतलेल्या आढावा बैठकांच्या इतिवृत्तातील नमूद मुद्यांबाबत मा.मुख्यमंत्री महोदयांकडे होणा-या पुढील बैठकीपूर्वी त्याबाबतचे शासन निर्णय / शासन परिपत्रक / आदेश / मार्गदर्शक सूचना / निर्देश इ. निर्गमित करण्याची कार्यवाही संबंधित प्रशासकीय विभागाने करावी. सचिव समितीने याकरिता प्रशासकीय विभागाकडे सातत्याने पाठपुरावा करावा व मुख्य सचिव यांचेकडे अहवाल सादर करावा.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८१००११६१७४७५११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DEBASHISH CHAKRABARTY

Digitally signed by DEBASHISH CHAKRABARTY
DN: c=IN, o=SHIVSHAHI PUNARVASAN PRAKALP LTD., postalCode=400051, st=Maharashtra, 2.5.4.20=4daed370a621e2af8f11cf24d5a7e91d2b66d4692e2b23b56c318ada6669ad76, serialNumber=95d383c8c075e901d5ea380253ffca99ff939d41e07ddb8ef6cf53b9de72e834, cn=DEBASHISH CHAKRABARTY
Date: 2018.10.01 17:46:11 +05'30'

**( देबाशिष चक्रवर्ती )**
अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग
महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सर्व मा. मंत्री महोदय यांचे खाजगी सचिव,
४. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
६. अपर मुख्य सचिव, गृह विभाग
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग
८. अपर मुख्य सचिव, उद्योग विभाग

९. अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग
१०. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग
११. अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
१२. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग
१३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
१४. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
१५. प्रधान सचिव (नवि-१), नगरविकास विभाग
१६. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग
१७. प्रधान सचिव (नवि-२), नगरविकास विभाग
१८. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग
१९. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
२०. सचिव, ग्रामविकास व पंचायत राज विभाग
२१. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग
२२. सचिव, मृद व जलसंधारण विभाग
२३. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग
२४. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव तथा पालक सचिव
२५. सर्व विभागीय आयुक्त
२६. सर्व आयुक्त, महानगरपालिका
२७. सर्व जिल्हाधिकारी,
२८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२९. सर्व पोलीस आयुक्त
३०. सर्व पोलिस अधिक्षक,
३१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, शासकीय मध्यवर्ती इमारत, पुणे-१
३२. महासंचालक (मेडा), म्हाडा कमर्शिअल कॉम्प्लेक्स, दुसरा मजला, येरवडा, पुणे-६.
३३. संचालक (तंत्रशिक्षण), तंत्रशिक्षण संचालनालय, महापालिका मार्ग, पो.बॉक्स नं.१९६७, मुंबई-१.
३४. आयुक्त (मनरेगा), नागपूर
३५. आयुक्त (समाज कल्याण), समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३६. आयुक्त (पशुसंवर्धन), पशुसंवर्धन आयुक्तालय, स्पायसर कॉलेज समोर, औंध, पुणे-७
३७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२१.
३८. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
३९. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
४०. निवडनस्ती, कार्यासन-१४११, नियोजन विभाग.

(शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.३४/का-१४११, दि. ०१ ऑक्टोबर, २०१८ सोबतचे सहपत्र)

**परिशिष्ट-१**

| अ.क्र. | समितीची रचना | जिल्हा |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग | ठाणे |
| | प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग | पालघर |
| | सचिव (जलसंधारण), मृद् व जलसंधारण विभाग | रायगड |
| | सदस्य सचिव (महाराष्ट्र जीवन प्राधिकरण) | रत्नागिरी |
| | | सिंधुदुर्ग |
| | | |
| २. | अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग | अमरावती |
| | प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग | अकोला |
| | प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग | बुलढाणा |
| | आयुक्त (कृषि), | वाशिम |
| | संचालक (तंत्रशिक्षण) | यवतमाळ |
| | | |
| ३. | अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग | पुणे |
| | सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सातारा |
| | सचिव, पंचायत राज व ग्रामविकास विभाग | सांगली |
| | महासंचालक (मेडा) | सोलापूर |
| | | कोल्हापूर |
| | | |
| ४. | अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग | नागपूर |
| | प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग | वर्धा |
| | सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग | चंद्रपूर |
| | आयुक्त (मनरेगा) | भंडारा |
| | | गोंदिया |
| | | गडचिरोली |
| | | |
| ५. | अपर मुख्य सचिव(सेवा), सामान्य प्रशासन विभाग | नाशिक |
| | प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग | जळगाव |
| | प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | नंदूरबार |
| | आयुक्त (सामाजिक न्याय) | अहमदनगर |
| | | धुळे |
| | | |
| ६. | अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग | औरंगाबाद |
| | प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग | परभणी |
| | सचिव, मुख्यमंत्री ग्राम सडक योजना | हिंगोली |
| | आयुक्त (पशुसंवर्धन) | लातूर |
| | | जालना |
| | | बीड |
| | | उस्मानाबाद |
| | | नांदेड |

(शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.३४/का-१४११, दि. ०१ ऑक्टोबर, २०१८ सोबतचे सहपत्र)

## परिशिष्ट-२

## नागपूर विभाग - नागपूर, भंडारा, वर्धा, गडचिरोली, चंद्रपूर व गोंदीया जिल्हा

### नागपूर जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | चिंचघाट सिंचन योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| २) | लमापूर लघु प्रकल्पास पुनर्वसन प्राधिकरणाची मान्यता देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |
| ३) | कृषी पंपासाठी वीज जोडणी प्रकल्पांतर्गत प्रलंबित ४३२६ ग्राहकांना वीज जोडणी देणे. (निविदा प्रक्रिया पूर्ण करणे) | कार्यकारी संचालक (महावितरण) |
| ४) | बावनथडी प्रकल्पांतर्गत व बाधित होणाऱ्या ५ गावठाणातील नागरी सुविधांकरीता ₹ ४.९५ कोटी उपलब्ध करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |
| ५) | कृषि पंपांसाठी प्रलंबित ४३२६ ग्राहकांना वीज जोडणी देण्यासाठी निविदा प्रक्रिया राबवून कार्यवाही पूर्ण करणे. | कार्यकारी संचालक (महावितरण) |
| ६) | पोलीस गृहनिर्माण अंतर्गत सादर १८ प्रकल्पांना मान्यता देणे. | अपर मुख्य सचिव (गृह) |

### भंडारा जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | गोसीखुर्द प्रकल्पांतर्गत भंडारा व नागपूर जिल्ह्यातील पुनर्वसनाकरीता विशेष मागणी असलेल्या गावांबाबत चौकशी करुन गावनिहाय अहवाल सादर करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |
| २) | ११ हजार विहिरी/माजी मालगुजारी तलावांच्या दुरुस्तीसाठी जिल्हा नियोजन व विकास समिती (DPDC) मार्फत निधी उपलब्ध करुन देणे. | सचिव (जलसंधारण) |
| ३) | नवोदय विद्यालयांकरीता अल्पसंख्याक विभागाच्या मुलींच्या वसतीगृहातील जागा उपलब्ध करुन देणे. | १) अपर मुख्य सचिव (महसूल)<br>२) प्रधान सचिव (अल्पसंख्याक) |
| ४) | कृषि पंपांसाठी वीज जोडणी देण्याकरीता सुधारीत निविदा प्रक्रिया राबवून त्वरीत कार्यवाही करणे व दि.३१/५/२०१८ अखेरपर्यंतचे अर्ज निकाली काढणे. | कार्यकारी संचालक (महावितरण) |
| ५) | वैनगंगा नदीतून खिंडसी जलाशयात पाणी सोडण्याबाबत निर्णय घेणे. | प्रधान सचिव (जलसंपदा) |

| | | |
|---|---|---|
| ६) | आजनसरा बॅरेज प्रकल्पाचा फेरनकाशा/आराखडा तयार करणे. | प्रधान सचिव (जलसंपदा) |
| ७) | एकात्मिक आदिवासी विकास कार्यालयासाठी आवश्यक तो अधिकारी/कर्मचारी वर्ग उपलब्ध करुन देणे. | प्रधान सचिव (आदिवासी विकास) |

## वर्धा जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | "धडक सिंचन विहीर योजना" कार्यक्रम वर्धा जिल्ह्यात राबविण्याकरीता भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेकडून (GSDA)अहवाल प्राप्त करुन घेणे. | १) अपर मुख्य सचिव (पापु व स्वच्छता)<br>२) सचिव (जलसंधारण) |
| २) | कृषि पंपांसाठी वीज जोडणी करीता प्रलंबित २६३३ अर्जांकरीता निविदा प्रक्रिया पूर्ण करणे. | कार्यकारी संचालक (महावितरण) |
| ३) | मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल योजनेत केळझर, ता.सेलू व सालोड, ता. वर्धा या गावांचा समावेश करणे (मा.मुख्यमंत्री व आमदार श्री.भोयर यांनी दत्तक घेतलेली गावे). | अपर मुख्य सचिव (पापु व स्वच्छता) |
| ४) | देवळी पाणी पुरवठा योजनेच्या १० किमी. लांबीच्या जलवाहिनीचे काम पूर्ण करणे. | अपर मुख्य सचिव (पापु व स्वच्छता) |
| ५) | ट्रॉमा केअर सेंटर, कारंजा या केंद्रास वैद्यकीय अधिकारी/कर्मचारी वर्ग उपलब्ध करुन देणे. | प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) |
| ६) | आजनसरा बॅरेज प्रकल्पाचा फेरनकाशा/आराखडा तयार करणे. | प्रधान सचिव (जलसंपदा) |
| ७) | एकात्मिक आदिवासी विकास कार्यालयासाठी आवश्यक तो अधिकारी/कर्मचारी वर्ग उपलब्ध करुन देणे. | प्रधान सचिव (आदिवासी विकास) |
| ८) | नागपूर-मुंबई समृध्दी महामार्गाकरीता आवश्यक जमीन संपादन/थेट खरेदीद्वारे महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास (MSRDC) हस्तांतर करणे. | १) अपर मुख्य सचिव (महसूल)<br>२) प्रधान सचिव (सार्वजनिक बांधकाम)<br>३) कार्यकारी संचालक (MSRDC) |
| ९) | लोअर वर्धा प्रकल्पांतर्गत आलीलपूर, धनोडी व निंबोली-दौलतपूर ता. आर्वी येथील नागरी सुविधेची कामे पूर्ण करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |

## गडचिरोली जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | मागेल त्याला शेततळे योजनेअंतर्गत प्रलंबित १२१९ शेततळयास अनुदान उपलब्ध करणे. | १) सचिव (जलसंधारण)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| २) | कृषि पंपांसाठी वीज जोडणी अंतर्गत प्रलंबित ४७१ अर्जांना मान्यता देऊन कार्यवाही पूर्ण करणे. | कार्यकारी संचालक (महावितरण) |

| | | |
|---|---|---|
| ३) | मेक इन इंडीया अंतर्गत सुरजगड प्रकल्पातून खनिज वाहतुकीचे काम स्थानिकांना देणे व त्याकरीता ५० ट्रक खरेदीबाबत कार्यवाही करणे. | अपर मुख्य सचिव (उद्योग) |
| ४) | मौ. पोटगाव, ता.देसाईगंज, खरमतटोला, गेवर्धा, सोनसरी ता.कुरखेडा, रेगडी ता.चार्मोशी, सिरोंचा व झिंगानुड, ता.सिरोंचा या ७ गोदामांचे प्रस्तावास मान्यता देणे. | १) अपर मुख्य सचिव (महसूल)<br>२) प्रधान सचिव (आदिवासी विकास) |
| ५) | अनुसूचित जाती/जमातीच्या शेतकऱ्यांना वीज जोडणी/सोलर पंप/डिझेल पंपांसाठी सामाजिक न्याय व आदिवासी विकास विभागांनी निधी उपलब्ध करुन देणे. | १) प्रधान सचिव (सामाजिक न्याय)<br>२) प्रधान सचिव (आदिवासी विकास) |
| ६) | पुराडा-मालेवाडा-येरकड-गोदलवाडी या ५० किमी. रस्त्याच्या सुधारणेसाठी ₹ १४३.७८ कोटी आणि ब्रह्मपुरी-आरमोरी-वैरागड-धानोरा या ४८ किमी. रस्त्याच्या सुधारणेसाठी ₹ ८२.३२ कोटी इतका निधी उपलब्ध करणे. | १) प्रधान सचिव (सार्व.बांधकाम)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ७) | कोटगल बॅरेजच्या बांधकामास पर्यावरण व वन विभागाची मान्यता घेणे. | १) प्रधान सचिव (पर्यावरण)<br>२) सचिव (वने) |
| ८) | रेंगुण उपसा सिंचन योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता (सु.प्र.मा.) देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ९) | वडसा-गडचिरोली रेल्वे प्रकल्पाकरीता आवश्यक शासकीय व वन जमिनीची परवानगी उपलब्ध करुन देणे. | १) अपर मुख्य सचिव (महसूल)<br>२) सचिव (वने) |

## चंद्रपूर जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | दिंडोरा प्रकल्पांतर्गत वाढीव मोबदल्या संदर्भात ₹ ३४ कोटी इतक्या सानुग्रह अनुदानाच्या प्रस्तावास मान्यता देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| २) | बाबुपेठ उड्डाण पूल प्रकल्पांतर्गत अतिक्रमण धारकांना द्यावयाच्या मोबदल्या संदर्भात निर्णय घेणे. | १) प्रधान सचिव (नगरविकास-२)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ३) | विभागीय तलाठी प्रशिक्षण केंद्र, चंद्रपूर येथे अधिकारी/कर्मचारी नियुक्त करणे. | अपर मुख्य सचिव (महसूल) |
| ४) | घोडाझरी शाखा व उपशाखा कालवा क्र.१ ची कामे पूर्ण करणे. | प्रधान सचिव (जलसंपदा) |
| ५) | माजी मालगुरी तलाव दुरुस्तीसाठी आवश्यक निधी ₹ ३२ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ६) | शास्त्रीनगर पोलीस स्टेशन व बल्लारपूर उपविभागीय पोलीस अधिकारी कार्यालयांच्या प्रस्तावास मान्यता देणे. | १) अपर मुख्य सचिव (गृह)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ७) | चिमूर येथे अतिरिक्त जिल्हाधिकारी कार्यालयास मान्यता देणे व निर्मिती करणे. | १) अपर मुख्य सचिव (महसूल)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |

| | | |
|---|---|---|
| ८) | नागभीड येथे १०० खाटांचे जिल्हा रुग्णालय मंजूर करणे. | १) प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ९) | कृषि पंपांसाठी वीज जोडणी अंतर्गत प्रलंबित ३९७१ अर्जांना मान्यता देऊन कार्यवाही पूर्ण करणे. | कार्यकारी संचालक (महावितरण) |

## गोंदिया जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | परसवाडा-धापेवाडा-गोंदिया या रस्त्यास हायब्रीड ॲन्युटी अंतर्गत मान्यता व सल्लागार नेमणुकीची प्रक्रिया पूर्ण करणे. | १) प्रधान सचिव (सार्वजनिक बांधकाम) |
| २) | रजेगाव-काटी व तेढवा-शिवणी उपसा सिंचन योजना कार्यान्वित करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ३) | निमगांव लघु पाटबंधारे प्रकल्पास अंतिम प्रशासकीय मान्यता देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ४) | पांढरवानी लघु पाटबंधारे प्रकल्प कार्यान्वित करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ५) | कृषि पंप जोडणीच्या प्रलंबित २८२० अर्जांच्या मंजूरीबाबत कार्यवाही पूर्ण करणे. | कार्यकारी संचालक (महावितरण) |
| ६) | धापेवाडा उपसा सिंचन योजना टप्पा-२ च्या प्रस्तावास मान्यता देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ७) | बेवावटोला लघु प्रकल्पास मान्यता देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ८) | "Safe Gondia Secure Gondia" Phase-२ प्रस्तावास मान्यता देणे. | अपर मुख्य सचिव (गृह) |

## अमरावती विभाग -- अमरावती, यवतमाळ, वाशिम, अकोला व बुलढाणा जिल्हा

## अमरावती जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | चिखलदरा सिडको प्रकल्प - स्कायवॉककरीता सिडको मार्फत मान्यता व रिंग रोड करीता भूसंपादन प्रक्रिया पूर्ण करणे. | १) प्रधान सचिव (नगरविकास-२)<br>२) अपर मुख्य सचिव (महसूल) |
| २) | राजपेठ रेल ओव्हर ब्रीज (RoB) प्रकल्पाकरीता भूसंपादन प्रक्रिया पूर्ण करणे. (**वॉर रुम प्रकल्प**) | प्रधान सचिव (नगरविकास-२) |
| ३) | अमरावती मलनि:सारण प्रक्रिया प्रकल्पाकरिता (Drainage/ Sewerage Treatment Plant) आवश्यक तो निधी उपलब्ध करुन देणे. (**वॉर रुम प्रकल्प**) | १) प्रधान सचिव (नगरविकास-२)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |

| | | |
|---|---|---|
| ४) | वासनी प्रकल्प - बोरगाव, पेठ या गावांचा पुनर्वसन गावांमध्ये समावेश करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |
| ५) | प्राथमिक आरोग्य केंद्र, शिरजगाव, कसबा व घुईखेड येथील वैद्यकीय अधिकारी/कर्मचारी यांची रिक्त पदे भरणे. | प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) |

**यवतमाळ जिल्हा**

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | जिल्ह्यात प्रस्तावित ९ नवीन विद्युत उपकेंद्र उभारण्यास मान्यता देणे व निधी उपलब्ध करुन देणे. | कार्यकारी संचालक (महावितरण)<br>अपर मुख्य सचिव (वित्त) |
| २) | बेंबळा व अरुणावती प्रकल्पांतर्गत पुनर्वसन गावठाणात सुविधा उपलब्ध करुन देण्याच्या प्रस्तावास मान्यता देणे व निधी उपलब्ध करुन देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |
| ३) | अडाण प्रकल्पासंदर्भात वाल्मी, औरंगाबादच्या अहवालाप्रमाणे प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर करणे. | प्रधान सचिव (जलसंपदा) |
| ४) | निम्न पैनगंगा प्रकल्पाच्या लाभ/बुडीत क्षेत्रातील खरेदी विक्री निर्बंध हटविल्याने शेतकऱ्यांच्या ७/१२ उताऱ्यातील इतर हक्कांच्या बोजाच्या नोंदी कमी करणे. | १) अपर मुख्य सचिव (महसूल)<br>२) प्रधान सचिव (जलसंपदा) |

**वाशिम जिल्हा**

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | मौजे बोरव्हा, घोटा शिवणी व मत्तर सवंग बॅरेजची कामे बलून पध्दतीने पूर्ण करण्याचे सुधारीत प्रस्ताव शासनास SLTAC ने सादर करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (नियोजन) |
| २) | वाशिम शहराला पाणी पुरवठा करणाऱ्या एकबुर्जी प्रकल्पाच्या सांडव्याची उंची एक मीटरने वाढविण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ३) | अपूर्णावस्थेतील खडकी, गोडेगाव, पांग्राबंदी, इंगलवाडी, स्वामीन, पळसखेड हे प्रकल्प पूर्ण करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ४) | श्रीसंत सेवालाल महाराज व पोहरादेवी तीर्थक्षेत्रांची कामे सुरु करणे व त्यासाठी आवश्यक तो निधी उपलब्ध करणे. | १) प्रधान सचिव (ग्रामविकास)<br>२) अपर मुख्य सचिव (नियोजन)<br>३) अपर मुख्य सचिव (वित्त) |

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| ५) | सिंचन अनुशेष निर्मुलन कार्यक्रमांतर्गत माळेगांव संग्राहक, शेलगांव संग्राहक व रापेरी संग्राहक या प्रस्तावास मान्यता देणे. | प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) |
| ६) | IPDP अंतर्गत शासकीय कुक्कुटपालन केंद्र स्थापना करणे. | प्रधान सचिव (पदुम) |

## अकोला जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | कारंजा रमजापूर (नयन अंदुरा) प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता (सु.प्र.मा.) देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| २) | पूर्णा बॅरेज-२ (नेर धामणा) प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता (सु.प्र.मा.) देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ३) | अकोला महानगरपालिकेस जागा उपलब्ध करुन देणे. | अपर मुख्य सचिव (महसूल) |
| ४) | अकोला येथे स्पिनिंग हब व टेक्स्टाईल पार्क उभारण्याबाबत कार्यवाही करणे. | १) अपर मुख्य सचिव (उद्योग)<br>२) मुख्य कार्यकारी अधिकारी (महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ) |
| ५) | मोरणा रिव्हर फ्रंट डेव्हलपमेंट प्रकल्पास मान्यता देणे. | प्रधान सचिव (नगरविकास-२) |
| ६) | अकोट तालुक्यातील १८१ गावांच्या पाणीपुरवठा योजनेला मंजूरी देणे. | अपर मुख्य सचिव (पाणीपुरवठा व स्वच्छता) |
| ७) | आसटुल - पासटुल ता.पातूर ग्रामीण पाणीपुरवठा योजना कार्यान्वित करणे. | अपर मुख्य सचिव (पाणीपुरवठा व स्वच्छता) |
| ८) | तेल्हारा नगरपालिका पूरक पाणीपुरवठा योजना पूर्ण करणे. | १) अपर मुख्य सचिव (पाणीपुरवठा व स्वच्छता)<br>२) प्रधान सचिव (नगरविकास-२) |
| ९) | उमा बॅरेज प्रकल्पास पर्यावरण विभागाची मान्यता देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) प्रधान सचिव (पर्यावरण) |

## बुलढाणा जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | जिगांव पाटबंधारे प्रकल्प - नवीन भूसंपादन कायद्यानुसार लाभार्थ्यांना सानुग्रह अनुदान व प्लॉटचे वाटप करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |
| २) | कोलारी प्रकल्प प्रस्ताव SLTAC मध्ये मंजूरीसाठी सादर करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |

| | | |
|---|---|---|
| ३) | पेनटाकळी प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता (सु.प्र.मा.) देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ४) | सीड हब प्रकल्प कार्यान्वित करणे. | १) अपर मुख्य सचिव (उद्योग)<br>२) मुख्य कार्यकारी अधिकारी (महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ) |
| ५) | खडकपूर्णा पुनर्वसित गावांना नागरी सुविधा पुरविणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |
| ६) | कोलारी प्रकल्प, चिखलीचा प्रस्ताव सुधारित प्रशासकीय मान्यतेकरिता (सु.प्र.मा.) SLTAC कडे सादर करणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |

## औरंगाबाद विभाग - लातूर जिल्हा

### लातूर जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर अंतर्गत अतिविशेष उपचार रुग्णालयासाठी जुन्या रेल्वे स्थानकाची जागा हस्तांतरीत करणे. | १) अपर मुख्य सचिव (महसूल)<br>२) सचिव (वैद्यकीय शिक्षण) |
| २) | साई उच्च पातळी बंधारा व पोहरेगाव बंधाऱ्यासाठी भूसंपादनाची रक्कम उपलब्ध करुन देणे. | १) प्रधान सचिव (जलसंपदा)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त)<br>३) अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |

## नाशिक विभाग -- अहमदनगर, धुळे, नंदूरबार, नाशिक व जळगाव जिल्हा

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | मनरेगा अंतर्गत कुशल देयकांअभावी प्रलंबित कामांकरीता एकूण ₹ ११०० कोटी इतका निधी केंद्र शासनाकडून प्राप्त करुन घेणे. | अपर मुख्य सचिव (वित्त)<br>सचिव (रोहयो) |
| २) | सन २००९-१० पर्यंतच्या अनुसूचित जाती/जमातीच्या लाभार्थ्यांच्या जुन्या घरकुलांना अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देणे. | १) प्रधान सचिव (ग्रामविकास)<br>२) प्रधान सचिव (सामाजिक न्याय)<br>३) प्रधान सचिव (आदिवासी विकास)<br>४) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ३) | घरकुल बांधणीकरीता सरकारी जागा (गायरान जागा) उपलब्ध करुन देणे. | १) अपर मुख्य सचिव (महसूल)<br>२) प्रधान सचिव (ग्रामविकास) |

**<u>कोकण विभाग -- ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग जिल्हा</u>**

| अ.क्र. | प्रकल्प/योजना | कार्यवाही करणारे अधिकारी |
|---|---|---|
| १) | शाश्वत सिंचन योजनेच्या अंमलबजावणीसाठी शेततळे देण्याबाबतची योजना राबविणे. | १) सचिव (जलसंधारण)<br>२) सचिव (कृषी) |
| २) | प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत मंजूर ₹ ६५० कोटींचा निधी वितरीत करण्याबाबत केलेली कार्यवाही. | १) प्रधान सचिव (ग्रामविकास)<br>२) अपर मुख्य सचिव (वित्त) |
| ३) | कोकण विभागातील पाऊस विचारात घेता, चिरा दगडाचा वापर करुन घरबांधणी करण्याबाबतचे धोरण तयार करणे. | १) प्रधान सचिव (ग्रामविकास)<br>२) प्रधान सचिव (सामाजिक न्याय)<br>३) प्रधान सचिव (आदिवासी विकास) |
| ४) | नारळ लागवडीसाठी आंतरपीकाला (Inter Cropping) रोहयो अंतर्गत परवानगी देणे. | सचिव (जलसंधारण व रोहयो) |
| ५) | “लाखी बाग” या उपक्रमात कोको या पीकाचा समावेश करणे. | सचिव (जलसंधारण व रोहयो) |
| ६) | किल्ले रायगड प्रकल्पाकरीता आवश्यक ते तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे. | १) प्रधान सचिव (सार्व.बांधकाम)<br>२) प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) |

(शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.३४/का-१४११, दि. ०१ ऑक्टोबर, २०१८ सोबतचे सहपत्र)

## परिशिष्ट-३

**१. प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) -**

- योजनेंतर्गत दिलेले उद्दिष्ट व एकूण पूर्ण झालेल्या घरांची संख्या यांचा आढावा घेण्यात येईल.
- जिल्ह्यातील सर्वात कमी उद्दिष्टे पूर्ण केलेले ३ गट विकास अधिकारी कारणमीमांसा स्पष्ट करतील.

**२. प्रधानमंत्री आवास योजना (नागरी), महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान योजना व अमृत योजना -**

- योजनेंतर्गत मंजूर झालेले प्रकल्प, प्राप्त निधी व कामाची भौतिक प्रगती याचा आढावा घेण्यात येईल.
- जिल्ह्यातील सर्वात कमी उद्दिष्टे पूर्ण केलेले ३ मुख्याधिकारी / महानगरपालिका आयुक्त / म्हाडा कारणमीमांसा स्पष्ट करतील.

**३. जलयुक्त शिवार योजना + महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना (महानरेगा) + धडक विहिरी योजना -**

- योजनेंतर्गत सर्वात कमी उद्दिष्ट पूर्ती केलेल्या ३ तालुक्यांचा आढावा.
- गाव जलयुक्त करणेबाबत सर्वात कमी उद्दिष्ट पूर्ती केलेल्या ३ तालुक्यांचा आढावा.

**४. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल योजना -**

- जिल्ह्यातील एकूण मंजूर योजना व प्रत्यक्ष कामाची भौतिक प्रगती याचा आढावा घेण्यात येईल.
- राष्ट्रीय ग्रामीण पाणी पुरवठा विकास प्रकल्प (NWRDP) आढावा / जिल्हयाचे मंजूर योजना पूर्तीबाबत संबंधित कार्यकारी अभियंता / उप अभियंता यांचा आढावा.

**५. अण्णासाहेब पाटील आर्थिक विकास महामंडळ योजना व मुद्रा योजना -**

- या योजनांमार्फत बँकेत सादर करण्यात आलेल्या कर्ज प्रकरणांचा आढावा.
- विविध विभागांच्या ऑनलाईन DBT योजनेंतर्गत शिष्यवृत्ती प्रकरणांचा आढावा.

**६. मुख्यमंत्री ग्राम सडक योजना -**

- जिल्ह्याचे उद्दिष्ट (K.M.मध्ये) पूर्ण झालेले व प्रगती पथावर असणारे काम (K.M.मध्ये) व उद्दिष्ट पूर्तीमध्ये पिछाडीवर असणा-या ३ तालुक्यांचा, कार्यकारी अभियंता / उप अभियंता यांचा आढावा.

**७. दलित वस्ती सुधार योजना / ठक्कर बाप्पा योजना -**

**८. जिल्ह्यातील / महानगरपालिका क्षेत्रातील २ वैशिष्ट्यपूर्ण पथदर्शक प्रकल्प -**

- पाणीपुरवठा, भूमिगत गटार योजना, मलनि:सारण योजना इ.

**९. बळीराजा योजना -**

- अंमलबजावणीत सर्वात कमी उद्दिष्टपूर्ती केलेल्या ३ तालुक्यांचा आढावा.

**१०. पंतप्रधान कृषि सिंचन योजना -**

- अंमलबजावणीत सर्वात कमी उद्दिष्टपूर्ती केलेल्या ३ तालुक्यांचा आढावा.

**** जिल्ह्यातील कायदा व सुव्यवस्थेचा आढावा ** -**

पोलीस स्टेशन निहाय - i) Conviction Rate

ii) महिला अत्याचार संबंधी गुन्हयांची संख्या

iii) नोंद झालेले गुन्हे, पैकी Detected व Undetected गुन्हयांची संख्या.

वरील बाबींचा जिल्ह्यातील पोलीस स्टेशननिहाय आढावा घेण्यात येईल. त्या अनुषंगाने सर्वात कमी कामगिरी असणारे ४ पोलीस इन्स्पेक्टर कारणमीमांसा स्पष्ट करतील.

(शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.३४/का-१४११, दि. ०१ ऑक्टोबर, २०१८ सोबतचे सहपत्र)

**परिशिष्ट -४**

१) अपर मुख्य सचिव, गृह विभाग
२) अपर मुख्य सचिव(वित्त), वित्त विभाग
३) अपर मुख्य सचिव(उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
४) अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग
५) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग
६) अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
७) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग
८) अपर मुख्य सचिव(महसूल), महसूल व वन विभाग
९) प्रधान सचिव(ऊर्जा) , उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
१०) प्रधान सचिव (नवि-१), नगरविकास विभाग
११) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग
१२) प्रधान सचिव (नवि-२), नगरविकास विभाग
१३) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग
१४) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
१५) सचिव, ग्रामविकास व पंचायत राज विभाग
१६) सचिव(कृषि), कृषि व पदुम विभाग
१७) सचिव, मृद व जलसंधारण विभाग
१८) सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग
१९) संबंधित पालक सचिव
२०) संबंधित विभागीय आयुक्त
२१) संबंधित जिल्हाधिकारी
२२) संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२३) संबंधित पोलिस आयुक्त
२४) संबंधित पोलिस अधिक्षक
२५) संबंधित महानगरपालिका आयुक्त.

**तळटीप :-**

(१) जिल्हा / विभागनिहाय होणाऱ्या आढावा बैठकीस अ.क्र. १ ते ८ येथील अधिकारी प्रत्यक्ष किंवा व्हिडीओ कॉन्फरन्सिग (Video Conferencing) च्या माध्यमातून उपस्थित राहतील.

(२) जिल्हा / विभागनिहाय होणाऱ्या आढावा बैठकीस अ.क्र. ९ ते १८ येथील अधिकारी व्हिडीओ कॉन्फरन्सिग (Video Conferencing) च्या माध्यमातून उपस्थित राहतील.

(३) जिल्हा /विभागनिहाय होणाऱ्या आढावा बैठकीस पालक सचिव व क्षेत्रिय स्तरावरील अ.क्र. १९ ते २५ येथील प्रत्यक्ष उपस्थित राहतील.